जिल्हा निवड समित्यांनी रिक्त पदे भरण्यासाठी तातडीने कार्यवाही करणेबाबत

**महाराष्ट्र शासन**
**सामान्य प्रशासन विभाग**
**शासन परिपत्रक क्रमांकः एसआरव्ही २०१५/प्र.क्र. २६६ /कार्यासन १२**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक, मंत्रालय, मुंबई ४०००३२
तारीख: २६ मे, २०१५

<u>वाचा</u>- १. शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग क्रमांक प्रानिमं-२००७/प्र.क्र.४६/०७/१३अ दिनांक १९ ऑक्टोबर २००७ व दिनांक २७ जून २००८
२. शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग, क्रमांक एसआरव्ही -२०१४/प्र.क्र.४५/१२ दिनांक ३ जून २०१४

**शासन परिपत्रक-**

महाराष्ट्र लोकसेवा आयोगाच्या कक्षेत नसलेली गट-“क” वर्गीय पदे व गट “ब” अराजपत्रित पदे सरळसेवेने भरताना अनुसरावयाची धोरण व कार्यपध्दती उपरोक्त संदर्भ क्र.१ येथील शासन निर्णयाअन्वये निश्चित केली आहे. जिल्हाधिकाऱ्यांच्या अध्यक्षतेखालील जिल्हास्तरीय निवड समित्या, प्रादेशिक विभाग प्रमुखांच्या स्तरावरील प्रादेशिक निवड समित्या व विभाग प्रमुखांच्या स्तरावर राज्य स्तरीय निवड समित्या या धोरणानुसार स्थापन करण्यात आल्या असून, त्याद्वारे गट-“क” व गट “ब” अराजपत्रित मधील रिक्त पदांवर भरती केली जाते.

राज्यातील शासकीय कार्यालयातील गट “अ ” ते गट “ड ”संवर्गातील सरळसेवेची पदे भरण्यासाठी विहित केलेली प्रतिवर्षी मंजूर पदांच्या कमाल ३ टक्केची मर्यादा संदर्भ क्र.२ येथील शासन निर्णयान्वये रद्द करण्यात आली आहे.

सद्य:स्थितीत नोकर भरतीवर बंदी नसल्याने, रिक्त पदे तातडीने भरण्याच्या दृष्टीने सर्व जिल्हयांनी जिल्हा निवड समित्यांच्या अखत्यारीतील रिक्त पदांची मागणीपत्रे संबंधित निवड समित्यांकडे तात्काळ पाठवावीत. प्रत्येक जिल्हयातील जिल्हा निवड समित्यांनी त्यांच्या अखत्यारितील सर्व रिक्त पदे भरण्याबाबत व नवीन नेमणूका विहित मुदतीत करण्याबाबत उपाययोजना करुन त्याची तात्काळ अंमलबजावणी करावी.

सदर शासन परिपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५०५२७१६२०१६९२०७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Surve Rajendra K
Digitally signed by Surve Rajendra K
DN: c=IN, o=Mantralaya Canteen, ou=Mantralaya Canteen, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Surve Rajendra K
Date: 2015.05.27 16:27:03 +05'30'

**राजेंद्र सुर्वे**
सहसचिव, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१) सर्व मंत्रालयीन प्रशासकीय विभागाचे अपरमुख्य सचिव/प्रधान सचिव/सचिव,
२) सर्व विभागीय आयुक्त,
३) सर्व जिल्हाधिकारी,
४) सर्व मंत्रालयीन प्रशासकीय विभाग,
५) मंत्रालयीन विभागाच्या प्रशासकीय नियंत्रणाखालील सर्व विभाग प्रमुख,प्रादेशिक विभाग प्रमुख व कार्यालय प्रमुख
६) सामान्य प्रशासन विभागातील सर्व कार्यासने
७) निवडसूची